**ओम शिक्षण संस्था, सुभाषनगर, किनवट, जि.नांदेड संचलित सावित्रीबाई फुले स्वतंत्र कनिष्ठ महाविद्यालय, शिवणी, ता.किनवट, जि.नांदेड या कनिष्ठ महाविद्यालयाचे बेल्लोरी (धानोरा) ता.किनवट, जि.नांदेड येथे केलेल्या स्थलांतरास कार्योत्तर मान्यतेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र १३१६/प्र.क्र.४१८/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०२०

**वाचा :**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. माशास्थ २०१२/(५९/१२) माशि-२, दि. ३१ जुलै,२०१३.

**संदर्भ :**

१) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर यांचे क्र.शिउसला/कमवि/एमडीपी/१४९९८/१५०००/२०१५-१६, दि.२१ सप्टेंबर, २०१५ चे पत्र
२) शासनाचे पत्र क्र.न्यायाप्र १३१६/प्र.क्र.४१८/एस एम-१, दिनांक ९ जून, २०१७
३) सहायक निबंधक, मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठाने रिट याचिका क्रमांक ३३५/२०११ च्या अनुषंगाने क्र.सिव्हिल/डी.डी./क्र.४२४०/२०१७, दिनांक ९ फेब्रुवारी, २०१७ चे पत्र.
४) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर यांचे क्र.शिउसला/कमवि-४/१०६९०/९२/२०१७-१८ दि.४ ऑगस्ट, २०१७ चे पत्र
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. न्यायाप्र १३१६/४१८/एस एम-१, दि.१९ डिसेंबर, २०१८.

**प्रस्तावना :**

ओम एज्युकेशन सोसायटी, सुभाषनगर, किनवट, जि.नांदेड संचलित सावित्रीबाई फुले स्वतंत्र कनिष्ठ महाविद्यालय (कला शाखा), शिवणी, ता.किनवट, जि.नांदेड या मराठी माध्यमाच्या विनाअनुदानित कनिष्ठ महाविद्यालय शासन मान्यतेशिवाय सन २०१०-११ पासून बेल्लोरी (धानोरा) ता.किनवट, जि.नांदेड येथे स्थलांतर करण्यात आले. याबाबत संस्थेने मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ३३५/२०११ च्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक (४) येथील पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव संदर्भाधीन क्रमांक (५) अन्वये अमान्य करण्यात आला होता. तथापि सदर संस्थेकडून प्राप्त झालेल्या विनंतीवर प्रस्ताव फेरसादर करण्याबाबत आदेशित केल्यानुसार उपरोक्त कनिष्ठ महाविद्यालय कार्योत्तर स्थलांतर प्रस्तावावर पुन्हा निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त कनिष्ठ महाविद्यालयाच्या स्थलांतराबाबत संदर्भाधीन क्रमांक (५) येथील शासन आदेश अधिक्रमित करून वर नमूद ठिकाणी केलेल्या स्थलांतरास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे.:-
(१) संस्थेने स्थलांतरीत ठिकाणी कनिष्ठ महाविद्यालयामध्ये आवश्यक भौतिक सुविधा १८ महिन्यांच्या आत उपलब्ध करणे अनिवार्य राहील तसे न केल्यास सदर कनिष्ठ महाविद्यालयाची मान्यता रद्द करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

(२) स्थलांतरापूर्वी कार्यरत असलेल्या अर्हताप्राप्त शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना स्थलांतरित ठिकाणी समायोजित करून घेण्यात आले आहे व स्थलांतराबाबत त्यांची काहीही तक्रार/ आक्षेप नाहीत, याबाबत त्यांचे संस्थेच्या अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र घेण्यात यावे.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(४) स्थलांतरीत कनिष्ठ महाविद्यालयाची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(५) स्थलांतरीत कनिष्ठ महाविद्यालयाच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत.

(६) सदर कनिष्ठ महाविद्यालय मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(७) शाळेचे यापुढे शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय स्थलांतर करण्यात येणार नाही, याबाबत संस्थेस समज देण्यात यावी व अध्यक्ष/ सचिवांचे शपथपत्र घेण्यात यावे.

(८) सदरहू स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. वरील अट क्र.(२) ची पुर्तता झाल्यावर, विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांनी सदर शाळेच्या स्थलांतरास मान्यता देण्याबाबत ४ आठवडयात पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०३१२३००५५१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.02.04 13:41:40 +05'30'

( प्रविण मुंढे )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर
३. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, नांदेड
४. अध्यक्ष/ सचिव, ओम एज्युकेशन सोसायटी, सुभाषनगर, किनवट, जि.नांदेड
५. निवडनस्ती ( एसएम-१).